सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयाकरिता ७ अतिरिक्त लघुलेखक (निम्नश्रेणी) मनुष्यबळ सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सवना-१९२४/२०१/प्र.क्र.२२/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०००३२.
दिनांक: १४ मे, २०२४

**वाचा:-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१९१(भाग १)/१६/का.८, दि.१८ एप्रिल, २०२३
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दि. २७ एप्रिल, २०२२
३) विधि व न्याय विभाग, शाखा नागपूर यांचे पत्र क्र.सवना-४ / ३७८१ / प्र.क्र.०३ / २०२४/१७५, दि.०१.०२.२०२४ व पत्र क्र.सवना-२३२४ /३७८१/प्र.क्र.०३/२०२४/ २८४, दि.२१.०२.२०२४
४) उपसमितीच्या दि. १५ एप्रिल २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त क्र. पदनि-२०२४/ प्र.क्र.१०/आपुक, दि. २६एप्रिल,२०२४

**प्रस्तावना:-**

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, दि.१८ एप्रिल, २०२३ अन्वये कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयाकरिता विविध संवर्गातील ५८ नियमित पदे मंजूर असून गट-ड संवर्गातील १८ पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयाचे कामकाज मा. उच्च न्यायालयाशी निगडित असून अपुऱ्या मनुष्यबळामुळे न्यायालयाच्या कामकाजात अडथळे निर्माण होतात. त्यामुळे विधि व न्याय विभाग, शाखा नागपूर कार्यालयाने सदर कार्यालयाकरिता ७ अतिरिक्त लघुलेखक (निम्नश्रेणी) काल्पनिक पदे मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सादर केला होता. सदर प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय, दि.९ जून २०१७ अन्वये गठित उपसमितीने दि. १५ एप्रिल २०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार उक्त ७ अतिरिक्त पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याच्या प्रस्तावाला मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपसमितीच्या दि. १५ एप्रिल २०२४ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयाकरिता ७ अतिरिक्त लघुलेखक (निम्नश्रेणी) मनुष्यबळ सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, बाह्ययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेताना प्रचलित कायद्याचा भंग होणार नाही याची दक्षता कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्र.जे-०१, लेखाशीर्ष २०१४, न्यायदान, ११४, विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१) विधि सल्लागार व समुपदेशी, (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य) १०-कंत्राटी सेवा (२०१४ ०२९९)" खाली खर्ची टाकून तो चालू सन २०२४-२०२५ च्या व प्रतिवर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित, अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, यांच्या उपसमितीच्या दि. १५ एप्रिल २०२४ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२४०५१४१५२९५८२११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWATI LOHAR

Digitally signed by SWATI LOHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AB72B061785AE0359686D1C8A0DDB0F52744A155BE1924D6AB3706E1DE7E60EC, cn=SWATI LOHAR
Date: 2024.05.14 15:42:45 +05'30'

**( स्वा. सु. लोहार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपूर.
४) सह सचिव, कार्यासन-८, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव, विधि व न्याय विभाग, शाखा नागपूर .
६) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर
७) आस्थापना अधिकारी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९) कक्ष अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्यासन-२३), मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, (आपुक/व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती (कार्यासन-८).